**कोतवाल भरतीच्या दिनांक ७/५/१९५९ च्या**
**सेवाप्रवेश नियमामध्ये सुधारणा करण्याबाबत..**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- केओटी २००८/प्र. क्र. २२५/ई-१०
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- 20 MAY 2010

**वाचावे** :- १) शा.नि. पीकेए.१०५९/VI-L, बॉम्बे सरकार, सचिवालय, बॉम्बे दिनांक ७/५/१९५९ व त्यासोबतची सहपत्रे.

**प्रस्तावना** :- मुंबई कनिष्ठ गांव कामगार वतन निर्मूलन अधिनियम १९५८ (Bombay Iferior Watan Abolition Act १९५८) अन्वये गांव वतने नष्ट करण्यात आल्यांनतर वतनदारी का पध्दत संपुष्टात आली असून राज्यात दिनांक १/१२/१९५९ पासून पगारी कोतवालांची पध्दत अंमलात आली आहे. त्यानुसार कोतवाल पदांसाठी संदर्भाधीन दिनांक ७/५/१९५९ अन्वये सेवाप्रवेश नियम तयार करण्यात आलेले आहेत. सदरहू सेवाप्रवेश नियमानुसार कोतवाल भरती करण्यात येते. कोतवाल भरतीसाठी असलेल्या प्रचलित दिनांक ७/५/१९५९ च्या सेवाप्रवेश नियम करण्यात आले होते कोतवाल भरती करताना सर्व ठिकाणी समानता येण्यासाठी काही सुधारीत नियम व मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- कोतवाल पदांच्या भरतीसांठी सध्या अस्तित्वात असलेल्या दिनांक ७/५/१९५९ च्या सेवाप्रवेश नियम करण्यात आले होते. कोतवाल पदांच्या भरती करताना सर्व ठिकाणी नियुक्ती प्राधिकाऱ्यानी एकच पध्दत अनुसरावी जेणेकरुन कोतवालांची पदे भरताना सर्व ठिकाणी समानता येईल. यासंदर्भात सध्या अस्तित्वात असलेल्या सेवाप्रवेश नियमात खालीलप्रमाणे काही सुधारणा करुन नविन सेवाप्रवेश नियमांस शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

<u>सुधारीत नियम व मार्गदर्शक तत्वे --</u>

१) कोतवाल पदासाठी उमेदवाराची किमान शैक्षणिक अर्हता १२ वी पास इतकी असावा.(महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळाचे प्रमाणपत्र)
२) एमएससीआयटी संगणक अर्हता प्रमाणपत्र आवश्यक आहे.
३) कोतवाल भरतीसाठी उमेदवार १८ ते ४० या वयोगटातील असावेत.
४) कोतवाल भरतीसाठी जिल्हा अधिकारी यांच्या अथवा त्यांनी नामनिर्देशित केलेल्या अधिकाऱ्याच्या अध्यक्षतेखाली निवड समिती असावी.
५) कोतवाल भरतीसाठी लेखी व तोंडी परीक्षा घेण्यात यावी.
   अ) लेखी परीक्षा ही ७५ गुणाची असावी.
   ब) तोंडी परीक्षा ही २५ गुणाची असावी.
   क) १०० गुणाचे परीक्षेचे आधारावर मेरीट क्रम असावा.

६) कोतवालांसाठी सध्या अस्तित्वात असलेली २०० बिंदू नामावली ऐवजी सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक २९/३/१९९७ नुसार १०० बिंदू नामावलीची अंमलबजावणी करावी व आरक्षण कायद्यातील तरतुदीदेखील विचारात घ्याव्यात.

७) एकाच गावातील / सजातील एकापेक्षा अधिक सेवानिवृत्त / मयत कोतवालांच्या पाल्यांचे / वारसांचे अर्ज आल्यास शैक्षणिक गुणवत्तेऐवजी त्यांच्या ज्येष्ठतेनुसार निवड करावी.

३. वरीलप्रमाणे कोतवालांची पदे भरताना सुधारीत नियमानुसार पदे भरण्याची कार्यवाही करण्यात यावी व यापुढे कोतवालांची पदे भरताना सर्व ठिकाणी समानता येईल याबाबत संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्याने दक्षता घ्यावी व सदरहू नियमांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच सुधारित नियमानुसार कोतवालांची पदे भरताना सर्व ठिकाणी सुसूत्रता येईल याबाबत दक्षता घेण्याबाबतच्या सूचना विभागीय आयुक्तांनी सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांना द्याव्यात व सुधारीत नियमानुसार कोतवालांची पदे भरली जातील याबाबत विभागीय आयुक्तांनी विशेष लक्ष देवावे.

४. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौसंदर्भ क्र.२००९/ २६/ब दिनांक ४/१२/२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक - २०१००८२०१३३८५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(राजेंद्र बेंगळे)
अवर सचिव,
महसूल व वन विभाग.

प्रति,

१) सन्मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (महसूल ) यांचे खाजगी सचिव
४) सर्व विभागीय आयुक्त.
५) सर्व जिल्हाधिकारी
६) सर्व तहसिलदार
७) वित्त विभाग / सामान्य प्रशासन विभाग-१६/ब, मंत्रालय, मुंबई.
८) महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
९) निवड नस्ती ई १०